A:pol-14-note-52

**पोलीस कोठडीतील आरोपीस किमान सुविधा पुरविण्याकरिता करावयाच्या उपाययोजना**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

परिपत्रक क्र. एचआरसी १३२००४/संकीर्ण-५२/पोल-१४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ५ मे, २००५

**परिपत्रक**

राज्यातील पोलीस कोठडीतील पोलीसांच्या ताब्यातील आरोपींची घ्यावयाची काळजी व देखभाल यासंदर्भात वेळोवळी सूचना शासनाने आतापर्यंत दिलेल्या असून त्याप्रमाणे पोलीस महासंचालक यांचेकडूनही संबधीत पोलीस प्राधिका-यांना सूचित करण्यात आलेले आहे. तथापि राष्ट्रीय महिला आयोग, नवी दिल्ली यांनी शासनास सादर केलेल्या अहवालात श्रीमती विमल हरी उमप यांच्या पोलीस कोठडीत झालेल्या मृत्यूसंदर्भात नापसंती व्यक्त करुन पोलीस कोठडीतील अशा आरोपींना किमान सुविधा मिळण्याकरिता काही शिफारशी शासनास सादर केलल्या आहेत. या अनुषंगाने पोलीस कोठडीतील आरोपींना किमान सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत, त्यांची काळजी व देखभाल घेण्याकरिता संबधीत पोलीस प्राधिका-यांनी खालील बाबीकडे विशेष लक्ष देण्याकरिता शासन आदेश देत आहे.

१) पोलीस कोठडीतील आरोपीस चांगल्या स्थितीतील न फाटलेल्या चादरी, सतरंज्या इत्यादी बाबी पुरविण्यात याव्यात. तथापि सदर बाबींचा दुरुपयोग आरोपी करणार नाहीत,याकरिता कोठडीबाहेरील पहारेक-यांना सतर्क राहाण्याचा सूचना देण्यात याव्यात.

२) सदर कोठडीच्या बाहेर परंतु आरोपीच्या आवाक्याच्या पलिकडे उभ्या स्थितीतील पंखा ठेवण्यात यावा अथवा कोठडीतील गरम हवा बाहेर जाण्याकरिता एक्झॉस्ट पंखा लावण्यात यावा.

३) कोठडीतील प्रसाधनगृहाची दररोज स्वच्छता करण्यात यावी तसेच तेथील सांडपाण्याकरिता योग्य ती व्यवस्था असणे आवश्यक आहे.

४) कोठडीत स्वच्छ व पिण्यायोग्य पाण्याची सुविधा करण्यात यावी तथापि ही व्यवस्था शौचालयाच्या नळाद्वारे पुरविण्यात येऊ नये.

५) पोलीसांजवळ असलेली आरोपीची वैद्यकिय अभिलेख्याबाबतची माहिती, पोलीसांनी तालडीच्या वेळी इस्पितळात न्यावी व कर्तव्यावरील वैद्यकिय अधिका-यास ती उपलब्ध करुन दयावी.

वरील शासन आदेश सर्व संबंधितांना कळवून त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी. सदर आदेशाबरोबरच शासन असेही आदेश देत आहे की, राज्यातील सर्व पोलीस कोठडयामध्ये आवश्यक प्रकाश, हवा खेळती राहाण्याची सोय, कोठडीची स्वच्छता व त्या आरोपीस ठेवण्यालायक आहेत किंवा कसे या बाबींचे परीक्षण करुन त्याबाबतचा अहवाल, पोलीस महासंचालक हे राज्य शासनास सादर करतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स.व.माने)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस उप महानिरीक्षक,
सर्व जिल्हादंडाधिकारी,
सर्व पोलीस अधिक्षक,
सार्वजनिक बांधकाम विभाग,
सार्वजनिक आरोग्य विभाग,

*******